महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांना महिला व बाल विकास विभागाकडील बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब पदावरुन वर्ग करुन ग्राम विकास विभागांतर्गत पदावर पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः मविसे १०/२०१४/प्र.क्र.१७५/आस्था-३अ**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१

तारीख: ११ सप्टेंबर, २०१४

संदर्भ:-

1) **शासन आदेश क्रमांकः मविसे १०/२०१४/प्र.क्र.७८/आस्था-३अ, दिनांक २९ मे,२०१४**

**शासन आदेश:-**

उपरोक्त संदर्भीय आदेशान्वये पुणे विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांना महिला व बाल विकास विभागाकडील बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब पदावरुन वर्ग करुन ग्राम विकास विभागांतर्गत पदावर पदस्थापना देण्यात आली आहे. उपरोक्त आदेशामधील खालील नमूद अधिकाऱ्याच्या संदर्भीय आदेशामध्ये नमूद केलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांना स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वर्ग करुन देण्यात आलेली पदस्थापना | अंशतः बदल करुन देण्यात आलेली पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.एस.वाय.माळी | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दौंड, जिल्हा पुणे | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, आंबेगांव, जिल्हा पुणे | दि.२९.५.२०१४ च्या आदेशात अंशत: बदल करुन रिक्त पदी |

२. संबंधित अधिकाऱ्याने त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त/ मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदस्थापना दिलेल्या वरील नमूद अधिकाऱ्याला त्याच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्याच्या सूचना द्याव्यात.
४. संबंधित अधिकाऱ्याने नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.
५. उपरोक्त बदला व्यतिरिक्त संदर्भाधीन आदेशामध्ये नमूद केलेल्या इतर अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११४०६३५२२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Patil Ravindra Namdev

Digitally signed by Patil Ravindra Namdev
DN: CN = Patil Ravindra Namdev, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.11 18:20:21 +05'30'

**(रविंद्र पाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग
२) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग
३) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
४) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई
५) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
७) संबंधित अधिकारी ( मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत)
८) निवडनस्ती.